**<u>ॲड. प्रकाश शेट्टी, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत...</u>**
**आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई गु.र.क्र. २१/२०१५ (माता रमाबाई आंबेडकर मार्ग, पो.स्टे., मुंबई येथे दाखल गु.र.क्र.८६/२०१५) या गुन्हयातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०६२१/प्र.क्र. १४८/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २२ डिसेंबर, २०२१.

**<u>संदर्भ</u>**:- १. शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०२१/यु.ओ.आर.४५/कार्या-१४, दि.१/७/२०२१.
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनिमय, दि.२९.७.२०१५.
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनिमय, दि.१६.६.२०१७.

**शासन निर्णय:**

आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई गु.र.क्र. २१/२०१५ (माता रमाबाई आंबेडकर मार्ग, पो.स्टे., मुंबई येथे दाखल गु.र.क्र.८६/२०१५) या गुन्हयातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील कामकाजासाठी ॲड. प्रकाश शेट्टी यांची, विधि व न्याय विभाग, शासन अधिसूचना, दि. १/७/२०२१ अन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. ॲड. प्रकाश शेट्टी यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी प्रदान करण्यास शासन मान्यता देत आहे.

**मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई**

१) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रुपये ३५,०००/- (रुपये पस्तीस हजार फक्त)
२) विचारविनिमय फी (प्रति तास) - रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. प्रकाश शेट्टी यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अथसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ४७७/२०२१/व्यय-७, दि.१२/०७ /२०२१ अन्वये मिळालेल्या शासन मान्यतेनुसार तसेच उपरोक्त संदर्भाधीन २ व ३ येथील नमूद वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२२१६५०४७८७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2021.12.22 16:51:33 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. पोलीस आयुक्त, बुहन्मुंबई
२. पोलीस सह आयुक्त, आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई
३. पोलीस उप आयुक्त, आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई
४. वरिष्ठ पोलीस निरीक्षक, आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ , मुंबई .
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. ॲड.श्री. प्रकाश शेट्टी,११४, कॉमर्स हाऊस, प्लॉट क्र. १४०, नगीनदास मास्तर रोड, काळा घोडा, फोर्ट, मुंबई ४००००१.
९. विधी व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (व्यय-७)
११. निवड नस्ती (पोल-१०).